**मागणी क्रमांक ZA ०२, २२३० कामगार व सेवायोजना ००३)०३)(०२) (०८) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे व प्रवेश क्षमता वाढविणे २२३० ए२०९ या लेखाशिर्षांतर्गत "५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानापैकी वितरीत असलेल्या रुपये ५००.०० लक्ष (रू. पाच कोटी फक्त) इतक्या खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: खरेदीप्र./२०२१/प्र.क्र.१४६/व्यशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ जानेवारी, २०२२.

**<u>संदर्भ</u>:-** १. संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचे क्र.१२/नियोजन/खरेदी/प्रमा/२०२१-२२/प्र.क्र.४९/ २७६, दि.३०.११.२०२१ व दि. २४.१२.२०२१
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दि.१७.०४.२०१५
३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६,
४. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१ प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७,
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं/२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि. २४.०६.२०२१
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं/२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
७. कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउ/२०१९/प्र.क्र.२४३/ प्रशा-१, दि.१९.११.२०१९

**<u>प्रस्तावना :</u>**

महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी तसेच उर्वरित ठिकाणच्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुसरी पाळी सुरू करणे, प्रत्येक तालुक्यात शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे, राज्यातील ३२४५ प्रशिक्षणार्थी जागांचा अनुशेष दूर करणे इत्यादी कार्यक्रमांतर्गत शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये अधिकच्या तुकड्या सुरू करणे, सेंटर ऑफ एक्सलन्स योजना सुरू करणे संस्थांचा दर्जावाढ करणे व नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू करणे. अशा योजना रबविण्यात येत आहे.

तसेच सन २०१७-१८ पर्यंत औद्योगिक प्रशिक्षण संस्थेकरिता यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यात आलेली आहे. सदर खरेदीमध्ये या संस्थांचा समावेश नाही. तद्नंतर सन २०२०-२१ पर्यंत सदर संस्थांमधील व्यवसाय/ तुकड्यांमधील यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची कमतरता भरुन काढण्यात आलेली नाही. सदर संस्थांमध्ये प्रत्येक व्यवसायाच्या अभ्यासक्रमास राष्ट्रीय व्यवसाय प्रशिक्षण परिषद नवी दिल्ली यांनी ठरवून दिलेल्या व्यवसायनिहाय यंत्रसामुग्रीच्या यादीप्रमाणे यंत्र व साधनसामुग्री विकत घेणे आवश्यक असते. डीजीईटी, नवी दिल्ली यांचे व्यवसाय अभ्यसक्रमांच्या Training Manual च्या मानकांनुसार प्रशिक्षणार्थ्यांच्या प्रशिक्षणासाठी तसेच संलग्नतेसाठी यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची पुर्तता होणे आवश्यक असते. त्याशिवाय व्यवसायास संलग्नता प्राप्त होत नाही. या करीता सन २०२०-२१ या अर्थसंल्पित वर्षात रू. १०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंल्पीत झालेला असून या निधी पैकी रू. ५००.०० लक्ष इतका निधी वितरीत झालेला आहे. या वितरीत झालेल्या निधीच्या मर्यादित खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षक यांनी संदर्भ क्र. १ अन्वये प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार रू. ५००.०० लक्ष (रू. पाच कोटी फक्त)

“५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्टांतर्गत खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांच्या संदर्भ क्र.१ येथील दि. ३०.११.२०२१ व दि. २४.१२.२०२१ च्या पत्रात नमूद केल्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक ZA ०२, २२३० कामगार व सेवायोजना ००३)०३)(०२) (०८) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे व प्रवेश क्षमता वाढविणे या करीता २२३०ए२०९ या लेखाशिर्षांतर्गत “५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्टातर्गत रू. १०००.०० लक्ष इतक्या निधी अर्थसंल्पित झालेला असून वित्त विभाग शासन निर्णय दि. २४ जून, २०२१ व दि. १४ ऑक्टोबर, २०२१ च्या तरतूदीनुसार वितरीत झालेला रू. ५००.०० लक्ष (रू. पाच कोटी फक्त) इतक्या रक्कमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सदर यंत्रसामुग्री व यंत्रसामुग्रीवर येणारा खर्च मागणी क्रमांक ZA ०२, २२३० कामगार व सेवायोजना ००३)०३)(०२) (०८) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे व प्रवेश क्षमता वाढविणे या करीता २२३०ए२०९ “५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या लेखाशिर्षाखाली या उद्दिष्टाकरीता सन २०२१-२२ करिता मंजूर असलेल्या अनुदानातून सदरचा खर्च भागविण्यात यावा. मात्र प्रत्यक्षात खर्च रू. ५००.०० लक्ष (रू. पाच कोटी फक्त) इतक्या वितरीत झालेल्या मर्यादेतच करण्यात यावा.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अनुसार वित्तीय अधिनियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र. ३ नियम क्र. ७; अ.क्र.४, नियम क्र.७; अ.क्र.२६अ नियम क्र.७६; अ.क्र.२७अ नियम क्र.७६; अ.क्र.२७-ब नियम क्र.७६; अ.क्र.२८ नियम क्र.७६; अ.क्र.३७ नियम क्र.९० अन्वये प्रशासकीय विभागास अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारास वित्त विभाग अनौ.सं.क्र. ३०९/व्यय-६ दि. ०४.०१.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार तसेच संदर्भ क्र. ३,४ व ७ येथील शासन निर्णयातील तरतूदीचे काटेकोरपालन करण्याच्या व खालील अटी व शर्तींचा अधिन राहून सदर शासन निर्णयास मान्यता देण्यात येत आहे:-

**अ)** सदरहू यंत्रसामुग्री व साधन सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तसेच प्रस्तावातील परिशिष्टात समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

**ब)** उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व त्या विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णायान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील अटी व शर्ती आणि तरतूदीनुसार, काटेकोरपणे पालन करुन, विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. तसेच सदर शासन निर्णयानुसार व विभागाच्या संदर्भ क्र. ७ येथील शासन निर्णय दि.१९.११.२०१९ अन्वये गठित केलेल्या समितीच्या मान्यतेने कार्यवाही करण्यात यावी.

**क)** उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६, आणि उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५//उद्योग-४, दि.२४ ऑगस्ट, २०१७ अन्वये दिलेल्य अटींच्या व शर्तींच्या अनुषंगाने संस्थास्तरावरुन GEM च्या माध्यमातून साहित्य खरेदी प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदी देयके कोषागारातून आहरित करु नयेत.

**ड)** प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या

बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी खातरजमा करावी.

**इ)** खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

**ई)** मागणी क्रमांक ZA ०२, २२३० कामगार व सेवायोजना ००३)०३)(०२) (०८) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे व प्रवेश क्षमता वाढविणे या करिता २२३०ए२०९ या लेखाशिर्षांतर्गत "५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या उद्दिष्टाकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रू. १०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंल्पीत झालेला असुन सद्दिस्थित रू. ५००.०० (रू. पाच कोटी फक्त) इतका निधी वितरीत झालेला आहे. या मर्यादेतच सदरचा खर्च करण्यात यावा व तशी दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११८१७५५३४८००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2022.01.18 17:57:29 +05'30'

**( प्रभाकर संखे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय.
३. संबंधित प्र.प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था.
४. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई, नांदेड, पुणे, धुळे, नाशिक, ठाणे, परभणी रत्नागिरी, व पनवेल.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. निवडनस्ती (व्यशि-४).